भा.प्र.से. अधिकाऱ्यांचे कार्यमुल्यांकन अहवाल प्रतिवेदन/पुनर्विलोकन/स्वीकृती अधिकारी ठरविणे.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः सीपीएफ-१०१८/प्र.क्र.१९ /२०१८/दहा,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२,
तारीख: **०८.०१.२०२०**

<u>**वाचा:-**</u> १) शासन परिपत्रक क्रमांक-सीपीएफ-१०१०/प्र.क्र.४४४/२०१०/दहा, दिनांक २८.०३.२०११.
२) शुध्दीपत्रक क्रमांक-सीपीएफ-१०१०/प्र.क्र.४४४/२०१०/दहा, दिनांक ०९.०५.२०१३.
३) शासन परिपत्रक क्रमांक-सीपीएफ-१०१८/प्र.क्र.१९/२०१८/दहा, दिनांक २१.०२.२०१८

<u>**शासन परिपत्रक**</u>

केंद्र शासनाने सन २००७-२००८ पासून भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांसाठी गोपनीय अहवालाऐवजी कार्यमुल्यांकन अहवाल (P A R) विहित करणारे सुधारित नियम अधिसूचित केले असून, राज्यातील सर्व (प्रत्येक) भा.प्र.से. अधिकाऱ्यांचे कार्यमुल्यांकन अहवाल कोणी प्रतिवेदन / पुनर्विलोकन / स्वीकृत करावे हे दर्शविणाऱ्या प्राधिकाऱ्यांची एकत्रित यादी दिनांक २८.०३.२०११ च्या परिपत्रकान्वये व दि.०९.०५.२०१३ च्या शुध्दीपत्रकान्वये ठरविण्यात आली आहे. तसेच, नव्याने निर्माण करण्यात आलेल्या पदांवरील भाप्रसे अधिकाऱ्यांसाठी दिनांक २१.०२.२०१८ च्या परिपत्रकान्वये प्रतिवेदन/पुनर्विलोकन/स्वीकृती प्राधिकारी निश्चित करण्यात आले आहेत.

२. राज्यातील खाजगी व्यावसायिक शैक्षणिक संस्थांच्या प्रवेश व शुल्क यांचे विनियमन करण्याकरिता महाराष्ट्र विनाअनुदानित खाजगी व्यवसायिक शैक्षणिक संस्था (प्रवेश व शुल्क याचे विनियमन) अधिनियम २०१५ अधिनियमान्वये शुल्क नियामक प्राधिकरण, प्रवेश नियामक प्राधिकरण व राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य या स्वायत्त प्राधिकरणांची निर्मिती करण्यात आली आहे.

३. राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष/प्रवेश नियामक प्राधिकरण व शुल्क नियामक प्राधिकरण या दोन्ही प्राधिकरणांच्या निर्मितीला व त्या करीता मंजूर पदांना शासन निर्णय दि.०४.०८.२०१५ च्या एकाच शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

३.१ आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष या पदाचे कार्यमुल्यांकन अहवाल सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय यांचेकडून प्रतिवेदीत व मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचेकडून पुनर्विलोकीत करण्यात येतात. तथापि सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण यांचे कार्यमुल्यांकन अहवाल मा.अध्यक्ष, शुल्क नियामक प्राधिकरण यांचेमार्फत प्रतिवेदीत/पुनर्विलोकीत करण्यात येतात. सबब आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष आणि सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण यांचे कार्यमुल्यांकन अहवाल प्रतिवेदीत व पुनर्विलोकीत करण्याच्या पध्दतीत समानता असणे आवश्यक असल्याने सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण या पदाचे कार्यमुल्यांकन अहवाल लिहिण्याकरिता सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांना प्रतिवेदन अधिकारी व मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांना पुनर्विलोकन अधिकारी म्हणून घोषित करण्याची विनंती उच्च व तंत्र शिक्षण विभागाने केली आहे.

३.२ आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई आणि सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई या पदांवर कार्यरत भा.प्र.से. अधिकाऱ्यांच्या कार्यमुल्यांकन अहवालासंदर्भात त्यांचे प्रतिवेदन / पुनर्विलोकन / स्वीकृती प्राधिकारी निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

४. उपरोक्त नमूद पदांवर कार्यरत भाप्रसे अधिकाऱ्यांच्या कार्यमुल्यांकन अहवालासंदर्भात पुढीलप्रमाणे प्रतिवेदन/पुनर्विलोकन/स्वीकृती प्राधिकारी निश्चित करण्यात येत आहेत:-

| Sr. No. | Designation | Reporting Authority | Reviewing Authority | Accepting Authority |
|---|---|---|---|---|
| 99 | Commissioner, State Common Entrance Exam Cell, Maharashtra, Mumbai | A.C.S / P.S. / Secretary, Higher and Technical Education Department, Mantralaya, Mumbai | Chief Secretary, Government of Maharashtra | Minister Concerned |
| 100 | Secretary, Fee Regularity Authority, Maharashtra, Mumbai | A.C.S / P.S. / Secretary, Higher and Technical Education Department, Mantralaya, Mumbai | Chief Secretary, Government of Maharashtra | Minister Concerned |

५. या व्यतिरिक्त इतर सर्व तरतुदी दिनांक २८.०३.२०११ च्या शासन परिपत्रकामध्ये, दि.०९.०५.२०१३ च्या शुध्दीपत्रकामध्ये आणि दि.२१.०२.२०१८ च्या परिपत्रकामध्ये नमूद केल्याप्रमाणे लागू राहतील.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००१०७१७३३५५१०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sarita Rishi Bandekar Deshmukh

Digitally signed by Sarita Rishi Bandekar Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5140223e17381bc47a67b9fede8dda33c03e3e9ce591f826d8193080c68a08b8, serialNumber=e40a063b6b4e8f59f91f350aa6fec292a55db5bf8829c64d6c44e00a701cdaac, cn=Sarita Rishi Bandekar Deshmukh
Date: 2020.01.09 18:29:49 +05'30'

**(स.रि.बांदेकर-देशमुख)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,
४. संबंधित मंत्र्यांचे खाजगी सचिव,
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,
६. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
७. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,
८. आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१०. निवडनस्ती.